उपआयुक्त या पदावर तात्पुरत्या
स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक-मबाआ-२०१८प्र.क्र.८९ (भाग-१)/का-७**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२
**दिनांक- ३० डिसेंबर, २०२१**

## शासन आदेश

महिला व बाल विकास विभागातील जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प.,सहायक आयुक्त,परिविक्षा अधिक्षक (गट-अ) ( वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५०० ) या संवर्गातील अधिकाऱ्यांना उपआयुक्त ( वेतनस्तर S-२३ : ६७७००-२०८७०० ) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर **स्तंभ क्रमांक ४** मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ .क्र. | अधिका-याचे नांव | सध्या धारण करीत असलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने नियुक्तीचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्रीम .एस .पी .पाटील | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, नाशिक | उपआयुक्त,(सनियंत्रण) एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई | श्रीम. पाटील यांनी त्यांच्या मुळ पदाचा कार्यभार श्री. अजय फडोळ, बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ना.) नाशिक-२ यांचेकडे सोपवून पदोन्नतीच्या पदस्थापनेवर तात्काळ रुजू व्हावे. |
| २. | श्री .एस .एच .माने | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना.) सोलापूर-पंढरपूर-बार्शी | उपआयुक्त,(अंगणवाडी) एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई या पदावर पदस्थापना देण्यात येवून विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास, पुणे विभाग या पदावर कामकाज व्यवस्था करण्यात येत आहे. | श्री. माने यांनी त्यांच्या मुळ पदाचा कार्यभार श्री.विजय खोमणे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना) सोलापूर-अक्कलकोट यांचेकडे सोपवून पदोन्नतीच्या पदस्थापनेवर तात्काळ रुजू व्हावे. |

२. सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्त्तीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाजेष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार शासन निर्णया प्रकरणी मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

३. सदर अधिकाऱ्यांची उप आयुक्त पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१. सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

२. या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही उपआयुक्त गट-अ संवर्गाच्या अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणा-या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून जेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाजेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५. सदर अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती कोणतीही पूर्व सूचना वा नोटीस न देता रदद करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

६. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्याला आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत उपआयुक्त या पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा व त्यांना उपआयुक्त या संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

७. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्याला नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास wcd-desk०७@gov.in या संकेत स्थळावर त्वरीत कळवावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२११२३००९३५३८५८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
Date: 2021.12.30 14:47:49 +05'30'

**(वि.रा.ठाकूर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई
३. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२) मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (म.व बा.वि.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. प्रधान सचिव (म.व बा.वि.वि),यांचे स्वीय सहाय्यक,मुंबई
७. संबंधित विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालय, पुणे मार्फत)
८. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा),मुंबई/नागपूर(आयुक्तालय,पुणे मार्फत)
९. संबंधित अधिदान व लेखाधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत)
१०.सर्व संबंधित अधिकारी, (आयुक्तालय, पुणे मार्फत)
११.निवडनस्ती ,कार्यासन ७ महिला व बाल विकास विभाग.